**महाराष्ट्र राज्यातील रेल्वे उड्डाणपुलाची कामे तसेच रेल्वेशी संबंधीत कामांचे समन्वयन करण्यासाठी समितीची स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. आरोबी २०१५/प्र.क्र.२५१/रस्ते-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १४/८/२०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीत रस्त्यांवरील रेल्वे उड्डाणपुलाची कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत रेल्वेच्या सहमतीने हाती घेऊन पुर्ण करण्यात येतात. ठाणे येथे कोपरी रेल्वे उड्डाणपुलांच्या रुंदीकरणाच्या संदर्भात विधी मंडळाच्या २०१४ च्या हिवाळी अधिवेशनात उपस्थित करण्यात आलेल्या तारांकित प्रश्नाला मा. मंत्री (सा.बां) यांनी दिलेल्या उत्तराच्या दरम्याने झालेल्या चर्चेमध्ये मा. मंत्री (सा.बां) यांनी राज्यातील रेल्वेच्या परवानगीमुळे थांबलेल्या प्रकल्पासंदर्भात रेल्वे मंत्रालयाशी चर्चा करुन कायम स्वरुपी पाठपुरावा करण्यासाठी समिती स्थापन करण्यात येईल असे आश्वासन विधी मंडळामध्ये दिले आहे. तसेच रेल्वे विभागाशी संबंधीत बरीचशी कामे रेल्वे विभागाशी योग्य प्रकारे समन्वय साधला न गेल्याने विहित कार्यक्रमाप्रमाणे सुरु झालेली नाहीत. सदर कामे करण्यासाठी येणा-या अडचणी दुर करणे व या कामांचा आढावा वेळावेळी घेऊन कामे विहित कार्यक्रमाप्रमाणे पुर्ण करण्यासाठी एका समितीची गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आता खालील प्रमाणे उपरोक्त विषयात नमुद केलेल्या कामासाठी समितीचे गठन करीत आहेत. समितीमध्ये खालीलप्रमाणे सदस्य राहतील.

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता विशेष प्रकल्प प्रादेशिक विभाग मुंबई | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ३ | अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, पुणे | सदस्य |
| ४ | अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| ५ | अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, नागपूर | सदस्य |
| ६ | उप सचिव (रस्ते) सा.बां. विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | सहायक मुख्य अभियंता विशेष प्रकल्प सा.बा. प्रादेशिक विभाग, मुंबई | सदस्य सचिव |

१. महाराष्ट्रातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ अखत्यारीतील सर्व प्रकल्पाची कामे रेल्वे उड्डाणपुलांमुळे प्रलंबित अथवा प्रस्तावित आहेत त्यांची एकत्रित माहिती संकलीत करणे व सार्वजनिक बांधकाम विभागास अवगत करणे.

२. सदर माहितीच्या अनुषंगाने मासिक प्रगती अहवाल सर्व संबंधीतांकडून मागवून एकत्रित अद्यावयत प्रगती अहवाल शासनास सादर करणे.

३. रेल्वे उड्डाणपुलांच्या प्रस्तावित/प्रगतीपथावरील सर्व कामांचा आढावा घेणे, रेल्वेची परवानगी न मिळाल्यामुळे थांबलेल्या कामांसाठी रेल्वे मंत्रालयाकडे पाठपुरावा करणे व कामे सुरू करण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न करणे

४. या सर्व प्रकल्पाचा कायम स्वरुपी पाठपूरावा नोडल ऑफिसर म्हणून मुख्य अंभियंता विशेष प्रकल्प प्रादेशिक विभाग मुंबई यांनी कामकाज करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०८१७१२०५४७४६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhatkhande C Vishwanath

Digitally signed by Bhatkhande C Vishwanath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhatkhande C Vishwanath
Date: 2015.08.17 12:09:01 +05'30'

**( चं.वि.भातखंडे )**

**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सा.बां)/सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग यांचे स्वीय सहाय्यक

२) संचालक महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई

३) अध्यक्ष, समिती आणि सर्व सदस्य व प्रतिनिधी, समिती

४) सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग

५) मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई

६) सर्व अधिक्षक अभियंते, सा.बां.विभाग

७) सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग

८) सर्व कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय

९) रस्ते-१ कार्यासन संग्रहार्थ (निवडनस्ती)